पुस्तकाचे नांवः **समजुतीच्या गोष्टी**

प्रकार : बाल-कुमार कथा

लेखक : अरूण वि देशपांडे

मो- ९८५०१७७३४२ फ़ोन :020/65240478

E Mail - arunvdeshpande@gmail.com

मुखपृष्ठ : स्वरा रामेश्वर सांबारी

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान®

esahity@gmail.com

www.esahity.com

ई साहित्य प्रतिष्ठान ही कवी, लेखक व वाचकांनी मिळून चालवलेली चळवळ आहे. नवीन उदयोन्मुख लेखकांसाठी हे व्यासपीठ आहे, आणि खेडोपाडी व देशोदेशी पसरलेल्या मराठी वाचकांसाठी वाचनाचे साधन आहे. ई पुस्तके. आता स्मार्टफ़ोनवर डाऊनलोड करून किंवा ऐपद्वारे वाचता येतात. आपण या चळवळीचे भाग होऊ शकता. आपल्या ओळखीच्या लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांनाही विनामूल्य ई पुस्तके पाठवू. नवीन वाचक आणि नवीन लेखकांचे या चळवळीत स्वागत आहे

नमस्कार मित्र हो -

ई- साहित्य प्रतिष्ठान यांचेकडून प्रकाशित होत असलेले हे माझे तिसरे ई-बुक आहे. इंटरनेटच्या माध्यमातून साहित्यविषयक कार्याचे महत्व लक्षात घेऊन त्या दृष्टीने "मराठी वाचकांपर्यंत - विविध साहित्य-आणि लेखन प्रकार" घेऊन जाण्याचे अत्यंत महत्वपूर्ण कार्य ई साहित्य प्रतिष्ठानचे सर्व कार्यकर्ते अगदी तळमळीने करीत आहेत.त्यांच्या या साहित्य-उपक्रमाची वाचकांकडून व मिडियाकडून दखल घेतली जात आहेच. त्यांचा एक लेखक-कवी म्हणून मीदेखील त्यांच्या या कार्याचा इथे अत्यंत आदरपूर्वक गौरवपूर्ण उल्लेख करणे माझे कर्तव्य समजतो.

प्रस्तुतचे इ- बुक - "समजुतीच्या गोष्टी " म्हणजे बाल-कुमार मित्रांशी केलेला कथा -संवाद आहे. "मनोरंजनातून -प्रबोधन" हा उद्देश सफल व्हावा हा प्रयत्न आहे. या कथा २०१३ या वर्षात नामवंत दिवाळी अंकातून आणि वृत्तपत्रांच्या रविवार पुरवणीतून प्रकाशित झाल्या आहेत. माझ्या स्नेही संपादकांचे मनःपूर्वक आभार. त्यांच्या प्रेरणेने हे लेखन आपल्यापर्यंत पुस्तक-रूपाने येते आहे.

आपले अभिप्राय इ- साहित्य प्रतिष्ठान ला आणि मला पण जरूर कळवा.

शुभेच्छा .

स्नेहांकित -

-अरुण वि.देशपांडे - पुणे.
मो- ९८५०१७७३४२ फ़ोन 020/65240478
E Mail - arunvdeshpande@gmail.com

## लेखक अरुण वि.देशपांडे यांचे प्रकाशित साहित्य (एकूण सुमारे ३५ पुस्तके)

प्रकाशित बाल-साहित्य --- एकूण -पुस्तके -२०

१. बाल-कथा -

१.- बागुलबुवा , २, -स्वावलंबन , ३-पप्पू आणि गणु ढोल्या , ४- सायलीची गोष्ट ,५- बालवीर पप्पू आणि इतर गोष्टी , ६, मोन्या , ७. गीरीबाबांची गोष्ट. ८, सोहमची गोष्ट .९. रेणूची गोष्ट

२. बाल-कविता -

१.गोड गोड चीकोबा , २. -धांगडधिंगा -मौजमस्ती , ३.- माझा तिरंगा प्यारा ४-. आली आली परीराणी ।

३. बाल- कादंबरी :-

१. चंदर , २.- बंटी , ३.- फुलपाखरू , ४ -पप्पूची पत्र ,

४.व्यक्तिचित्रणे :

- १. पप्पूचा अल्बम .

५.चरित्र :

१. संस्कार -मूर्ती - सानेगुरुजी ,

६. अनुवादः

१. श्रेष्ठ भारतीय बाल-कथा -(मल्याळी ).

ई- बुक प्रकाशित

१. झुळूक - ई- कथा संग्रह , २.- शो पीस -ई- कथा संग्रह ३- हळवी फुंकर - ई- कविता -संग्रह

ई- बाल साहित्य -

१. पियुचे स्वप्न - ई- बाल- कविता संग्रह.

मोठ्यांसाठीचे प्रकाशित साहित्य -

-६ कथा संग्रह , २-कविता संग्रह , २-समीक्षा -ग्रंथ , १- ललित लेख संग्रह , इतर - ४.- मोठ्यांसाठीची एकूण - १५ पुस्तके प्रकाशित .

कथानुक्रम -



पूर्व-प्रसिद्धी ";साहित्य चपराक - पुणे दिवाळी अंक- २०१३

पुनवडी प्रबोधन -पुणे - दिवाळी अंक पुणे - २०१३

दै.-प्रहार - मुंबई - बाल साहित्य -पुरवणी - नोव्हेंबर -डिसे. २०१३

# दुरून डोंगर साजरे

अजय नावाच्या मुलाची हे गोष्ट आहे. एका लहानश्या गावात रहाणाऱ्या अजयचे आई-बाबा साधारण परिस्थितीत रहाणारे पण अजयला मात्र आपल्या श्रीमंत मित्रांसारखे मौज -मजा करीत राहावे असे वाटत असयाचे.

बाहेर सारखा रहाणारा अजय घरात असला की सारखं म्हणायचा, " काय गं आई, तुम्हाला कशाचीच आवड नाही. सदा न कदा -अडचण आहे सध्या - असं म्हणतेस. बाबा पण कध्धी पैसे देत नाहीत. मला माझे मित्र म्हणतात - अजय, तुझे बाबा चिक्कू आहेत. पैसे असून खर्च करीत नाहीत."

अजयचे बोलणे ऐकून आई म्हणायची - "अजय,तू काय लहान नाहीस आता, तुला समजायला पाहिजे, आपण गरीब नसलो, तरी पैसेवालेही नाहीत. आणि तुझ्या बाबांना खूप जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागतात."

आई असे समजावून सांगू लागली की अजय चिडायचा - "हेच आई, तुझे, हे नाही-ते नाही, हे ऐकून मला कंटाळा आलाय. माझे बाकीचे मित्र- त्यांच्या घरात जाऊन बघ- कित्ती मजा असते. काही नवीन कर खाण्यासाठी, तर ते सुद्धा तू करीत नाहीस. तेच ते वरण-भात, पोळी -भाजी. डब्यात तेच आणि घरी आल्यावर तेच. मला तर हे बेचव खावं सुद्धा वाटत नाही.! "

तणतण करीत अजय बाहेर निघून जायचा.

त्याचे असे वागणे चुकीचे आहे, ही गोष्ट त्याला समजत नाही, याचे तिला वाईट वाटत होते. "अंथरूण पाहून पाय पसरावे ", या म्हणीचा अर्थ अजयला समजला असता तर तो असे वागलाच नसता. "सगळ्या गोष्टींचे सोंग करता येते - पण पैश्याचे सोंग करता येणे जमत नसते", त्यातून फक्त फजिती होते.

पण सध्या अजयच्या डोळ्यांना दिसत होते ते फक्त दुसऱ्यांच्या घरातील वैभव, त्या घरातले सुख.

अजय जसा मोठा होईल तसे त्याला जाणीव होईल, पण सध्या त्याला हे कसे पटावे, कि - आपले घर -आपले आई आणि बाबा यांचे वागणे चूक नाही. ती मनाशीच म्हणत होती ...। " देवा, या अजयला समज येऊ दे बाबा, त्याचे डोळे उघडू दे. नाही तर त्याच्या मनात आमच्या विषयी अढी निर्माण होइल."

पण आईला समाधान वाटावे असे काही घडत नव्हते. श्रीमंत घरातील लाडावलेल्या मुलांशी मैत्री करण्यात अजयला आनंद वाटत होता. वर्गातील मुलांपेक्षा तो इतर मुलांशी मैत्री ठेवण्याचा प्रयत्न करू लागला. त्या पैसेवाल्याना काय, अजय त्यांच्यासाठी नोकरा सारखा मागेपुढे फिरणारा हरकाम्या मुलगा. आणि ही पोरं तशी चलाख आणि बेरकी होती. हाटेलात नेऊन अजयला त्याच्या आवडीचे पोटभर खाऊ घातले की मग ते अजयला कामासाठी राबवून घेत. याच मौज-मजेला हपापलेल्या अजयचे दिवस आनंदात जाऊ लागले. आपल्या घरातले वातावरण त्याला आवडेनासे झाले. मित्रांच्या घरातील थाटमाट पाहून त्याची नजर बिघडली. साध्या-सुध्या रहाणीमानाची सवय असलेल्या आई-बाबांचा त्याला राग येऊ लागला. "आपले बाबा पक्के कंजूष आहेत", हे मित्रांचे शब्द त्याला खरेच वाटू लागले.

वर्गातील त्याचे मित्र त्याच्यातील बदल पाहून म्हणायचे ,"अजय, अरे, तू त्या मुलांचा मित्र म्हणवतोस कसे काय? तुझी आणि त्यांची बरोबरी तरी आहे काय? बघ बाबा - खाशील झटका एखादे दिवशी."

अजय म्हणायचा - "बेट्यानो, जळता तुम्ही माझ्या दोस्तांवर, मी त्यांचा आवडता आहे ना! तुम्हाला आवडत नाही हे, मला माहिती आहे ना हे ...!"

असे सांगून वर्गातील मित्रांनी त्यांचे कर्तव्य केले. पण अजयने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत - श्रीमंत मित्रांच्या बरोबर रहाण्यात आनंद मानला होता.

गेल्या काही दिवसापासून अजय नव्या कोऱ्या बाईकवर फिरतांना दिसत होता. आपल्याविषयीचा वाटणारा हेवा मित्रांच्या नजरेत दिसतो आहे असे वाटून अजय खुश होत होता.

एके दिवशी आई-बाबा त्याला म्हणाले. -हे बघ अजय, तुझे हे वागणे बिलकुल शोभणारे नाही. तुझ्या माणसाना सोडून, तू त्या परक्या मित्राना मानतोस, त्यांच्याकडून मौज-मजा करतोस. आमचा शब्द तू कानाआड करतांना त्यांचे शब्द मात्र झेलतोस ...!

त्यावर अजय म्हणाला - “बाबा, मी आता लहान नाही, तुम्ही मात्र हे मान्य करीत नाही, मला नासमज -पोरगा समजता. सारखं "हे चूक, ते बरोबर, हे करू नकोस, ते बरोबर नाही ...!” नुसता उपदेश - दुसरं काही बोलणं असतं का कधी आपल्या घरात?"

आईने बाबाना खुणावले - तुम्ही आता गप्प रहा. ती म्हणाली -अजय ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत  नाही. सध्या  त्याच्या समजदारीवर मित्र- प्रेमाचा पडदा आहे. त्याला यावेळी बोलून-सांगून काही उपयोग नाही. आता उलट बोलून तुम्हाला वाईट वाटेल अस काही होऊ नये, म्हणून तुम्हीच त्याला काही बोलू नका. कळण्याचे वय - आणि वळणावरचे वय मोठे नाजूक असते.!",

मुलांचे मन धावत्या पाण्यासारखे - " जिकडे उतार -तिकडेच ते धावते ", पण काय चांगले आणि काय वाईट ", हे तर कळाया हवेच ना?

बाबा मनापासून बोलत होते, त्यांच्या मनातील निराशाच व्यक्त झाली.

एक मात्र खरे की - अजयच्या बेताल आणि बेफाम वागण्याने घरातले सुख- समाधान हरवून गेले होते. लालची मनोवृत्तीला लगाम घालता आला नाही तर, मान-अपमान विसरून माणूस हव्या त्या गोष्टींसाठी जिवाचे रान करतो "वाट्टेल ते होवो, मला चैन करता आली पाहिजे. मनाला मारून रहाणे मला जमणार नाही."

आपल्या अजयची अवस्था अगदी अशा माणसासारखीच झाली आहे, हे जाणवून आईला वाईट वाटत होते.अजयच्या अशा वागण्यावर त्याला शिक्षा करणे, मारणे, हा उपाय केला तर तो अधिक उग्रपणे वागू लागला तर?, कसे आवरणार त्याला?आई-बाबांच्या पुढे हा मोठाच प्रश्न उभा होता. काही सुचत नव्हते.

एके दिवशी - अजयला त्याच्या मित्रांनी खूप पैसे देत म्हटले -, "तुला खूप ऐश करावी वाटते ना?, हे घे पैसे. राहू देत तुझ्या जवळच, परत-बिरत करायचे नाहीत, फक्त तुझ्यासाठी आहेत हे पैसे." अजयच्या हातात इतके पैसे पहिल्यांदाच येत होते. आता काय, दिवस--रात्र फक्त मौज -मजा, खाणे-पिणे - दुसरे काही नाही. होय- या मित्रांनी त्याला चटकदार सवयी लावल्या होत्या, त्या पूर्ण झाल्याच पाहिजे. कारण त्याची सवय लागली होती अजयला. मित्र नंतर म्हणाले - "अजय, पैसे मिळाले तुला, पण आता यापुढे आम्ही तुला जे जे सांगू, ते- ते तुला ऐकावे लागेल- आणि करावे लागेल. समजले?"

पैश्यापुढे विचार-शक्ती हरवून बसलेल्या अजयने मान डोलावली हे पाहून त्याचे मित्र मनापासून खुश झाले. मनात मात्र ते म्हणत होते - "बच्चू -आता या पुढे काय काय करावे लागेल? ते अजून माहिती नाहीये याला."

नव्या मोटरसायकलवर फिरणारा अजय गावभर फिरतो आहे हे पाहून त्याचे मित्र म्हणायचे - " अरे, हा अजय असा वाया जाईल असे वाटले नव्हते. त्याला अजून शाळेतून काढले नाही हे नशीब!"

त्या दिवशी सकाळी -सकाळी अजयच्या घरासमोर पोलिसांची गाडी येऊन उभी राहिली, लगेच आजूबाजूचे लोक जमा झाले.

"अजयचे बाबा म्हणजे एक सज्जन माणूस म्हणून परिचित होते. आता त्यांच्या घरासमोर पोलीस-गाडी? म्हणजे सज्जन माणूस पण बिघडला की काय?" अरे राम ...!

पण असे काहीच झालेले नव्हते, पोलीस आले होते, पण ते अजय बद्दल काही सांगायचे आहे म्हणून.-

" काल रात्री - म्हणजे आजच्या भल्या पहाटे- अजय आणि त्याच्या श्रीमंत मित्रांनी एका घरात घुसून -गोंधळ घातला, घरातील लोकांना मारहाण केली, धमक्या दिल्या. "

नंतर या पोरांना ठाण्यात आणल्यावर ही गोंधळ चालूच होता. ती पोर ओरडत होती- "आमचं काही बिघडवू शकत नाही कुणी , वरपर्यंत ओळखी आहेत आमच्या" वगैरे ...!

शेवटी पोरांना आत टाकल्यावरच संतप्त जमाव शांत झाला.

पोलीस साहेब सांगत होते. त्यांचे ऐकून घेत अजयच्या आई-बाबांनी भेदरलेल्या आवाजात विचारले - "यात आमच्या अजयचा काय दोष?, काय केले त्याने?"

आई-बाबाना धीर देत साहेब म्हणाले - "घाबरू नका" -, आणि ते सांगू लागले ।

" अहो, या गोंधळात तुमच्या अजयने काहीच केलेले नाहीये. तो लांबवर एका झाडाखाली कार उभी करून त्यात बसून हा गोंधळ पाहत होता. भितीने बोबडी वळली होती त्याची, जर का तो घरात सगळ्यांच्या सोबत सापडला असताना, तर त्याची खैर नव्हती. पण, हे पुरेसे नाही - या सगळ्या मुलांना तो सामील झाला आहे, हा दोष आहेच ना त्याचा, काही तरी फटका बसणार हे नक्की."

साहेब आई-बाबांना म्हणाले- "चला तुम्हाला यावे लागणार आहे आता ठाण्यात"

आणि इन्स्पेक्टर साहेबांच्या मागे मागे अजयचे आई-बाबा खाली मान घालून पोलिस -ठाण्याकडे निघाले. आज अजय मुळे, त्यांच्यावर हा अपमानाचा प्रसंग आला होता. सारेजण ठाण्यात आले.

आई-बाबांनी पाहिले- दंगा करणारी मोठ्या घरातली पोरं, त्यांची मस्ती अजून उतरली नव्हती. फटके खाल्ल्यावर अक्कल ठिकाण्यावर आली असती हे नक्की. कोपऱ्यात बसलेल्या अजयकडे आई-बाबांनी पाहिले, खाली मान घालून बसलेल्या अजयची त्यांच्याकडे नजर वर करून पहाण्याची हिम्मत होत नव्हती. आज त्याच्यावर जी वेळ आली होती,त्याला तो स्वतःच जबाबदार होता.

नजरेने फसवले की असेच होत असते,"साधेसुधे घर नकोसे वाटते, आणि दूरचे डोंगर मात्र साजरे दिसू लागतात." अशावेळी खाडकन डोळे उघडावे असे काही घडते.

अजयच्या बाबतीत अगदी असेच घडले, त्याचे आई-बाबा साधे -सरळ, असले तरी सज्जन आहेत, त्यांच्या सत्य -आचरणाला खूप मोल आहे, हे त्याला कळाले. सगळ्या गोष्टींचा विचार करून इन्स्पेक्टर साहेबांनी मग, "चांगल्या वर्तनाची हमी घेऊन, केवळ त्याच्या बाबांच्या शब्दांवर" अजयला घरी जाण्यास परवानगी मिळाली.

पुढे जाणाऱ्या आई-बाबांच्या सावलीकडे अजय पहात होता - त्याला वाटत होते -" आपण नशीबवान आहोत हेच खरे. आज ही सावली आपल्या सोबत नसती तर ....?"

# केल्याने होत आहे रे

सुधीर नावाच्या आपल्या एका मित्राची गोष्ट सांगतो तुम्हाला.

पुष्कळ वेळा काय होत की - "आपल्या मनात खूप काही येतं, आपण हे करू, आपण ते करू...!, पण प्रत्यक्ष कार्य करतांना मात्र उलट होऊन बसतं- कार्यारंभ होण्याअगोदरच त्या कार्याचा शेवट होतो.

सुधीरचा स्वभाव तसा थोडा चंचल, हातातली कामं मन लावून करणे, ते पूर्ण करणे, या पेक्षा त्याची जाहिरात करण्यात, बाता मारण्यातच त्याला भारी इंटरेस्ट, त्यामुळे व्हायचं काय की – 'उत्साहाच्या भरात आपण काय बोलून बसलोत?' हे देखील त्याच्या कधी -कधी लक्षात रहात नसे.

थोडक्यात सुधीरची अवस्था "गर्जेल तो पडेल काय?" अशी होती.

वर्गात, घरी, मित्रांबरोबर - सुधीर अशाच पद्धतीने वागत असे, त्यामुळे त्याच्यावर -त्याच्या बोलण्यावर कुणी विश्वास ठेवीत नसे, या गोष्टीचे सुधीरला वाईट वाटायचे. सुधीर काही वाईट स्वभावाचा मुलगा नव्हताच मुळी, उलट सर्वांना मदत करण्यात तो पुढे असायचा. त्यामुळे "मदतीस धावून येणारा मित्र" असा सुधीर सर्वांना हवाहवासा वाटत असे.

पण, म्हणतात ना - आपल्या अंगात अनेक सद्‌गुण असले तरी "एखादा दुर्गुण फार भारी पडतो", तसे सुधीरच्या बाबतीत होत असे. "क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे", या म्हणी प्रमाणे खुपदा घडत असे. कृती करायची नाहीच, पण त्याबद्दल नुसते बोलत सुटायचे ", असे दरवेळी कोण सहन करणार, नाही का?

एकदा सुधीरच्या घरात एक समारंभ होता. त्याची रूपरेषा -आणि चर्चा चालू होती. आई, बाबा, दीदी यांच्यासोबत सुधीर पण सहभागी होता. बाबा म्हणत होते – "हे बघा मंडळी, आपण जे कार्य हाती घेऊ, त्या अगोदर आपले

नियोजन हवे. त्याबद्दलचे पेपर-वर्क हवे. एकूण कार्यक्रमाचे एक स्वच्छ चित्र आपल्या मनात असले पाहिजे. तरच ते कार्य यशस्वी पार पडते. ऐनवेळेची घाई, त्यातून होणारी फजिती टाळायची असेल तर, आपल्या जवळ प्लॅनिंग असलेच पाहिजे."

आई आणि दीदीला बाबांचे सांगणे अगदी योग्य वाटले होते. कार्यक्रमाला पाहुणे येणार, अनेक निमंत्रित येणार. अशा सर्वासमोर फजिती होणे चांगले नाही. बाबांचे ऐकून घेत त्याच्या स्वभावाप्रमाणे सुधीर म्हणाला -"बाबा, तुम्ही काही काळजी करू नका, मी सर्व व्यवस्थित करतो. माझे मित्र मदतीला येतील. तुम्ही फक्त पहात रहा.",

सुधीर गेल्यावर बाबा म्हणाले -दीदी - सुधीर काम करेलच याची मला खात्री नाही. एकाच वेळी सगळीकडे असणारा हा पोरगा, ऐनवेळी तिसरीकडेच जायचा, आणि आपला कार्यक्रम "ओमफस". सुधीरचा उद्देश असतो चांगलाच, पण त्याचा हा स्वभाव सगळा घोळ करतो.

आई आणि दीदीला बाबांचे सगळे पटत होते. मनात त्यांना वाटत होते, "आपला हा सुधीरभाऊ - कधी सुधारणार कुणास ठाऊक?"

दुसरे दिवशी - शाळेतल्या स्पर्धा ठरल्या, त्याचे काम कोण कोण करणार?

सरांनी विचारल्यावर - आपल्या सुधीरभाउंनी हात वर केला -"सर, मी पाहतो ना!, काही काळजी करू नका."

सर म्हणाले - "सुधीर तुझी अवस्था म्हणजे - "नुसता उत्साह, कामाच्या नावाने मात्र गोंधळ"., तू एका वेळी इतक्या गोष्टीत लक्ष घालतोस की बस रे बस! "अगदी एक ना धड - भाराभर चिंध्या " अशी तुझी गत होते. अरे बाळा, एका वेळी एक काम करावे, त्याची पूर्ण माहिती मिळवावी, ते कसे करायचे याचे नियोजन करावे. आणि अनेकांच्या सहकार्याने - मदतीने ते करावे. कार्य छोटे किंवा मोठे असो, त्यात शिस्त हवी, नीटनेटकेपणा हवा. आणि याचा छान प्रभाव

सर्वांवर पडायलाच हवा. हे बघ सुधीर - मी हे करू की ते करू?, आधी हे करतो, मग ते करतो, अशा अवस्थेत कार्य कसे पूर्ण होणार? आणि जे होईल ते कसे होईल? याची कल्पना केलीस का कधी?"

वर्गातील सगळ्या मुलांसमोर - मित्रांसमोर सरांनी अगदी स्पष्टपणे सुधीरला सुनावले. सगळ्यांना वाटले - सुधीर आता नाराज होईल, वाईट वाटून घेईल हा मुलगा.

पण तसे झाले नाही. उलट सुधीर म्हणाला -"सर, तुम्ही म्हणता ते अगदी बरोबर आहे, माझे बाबासुद्धा मला असेच सांगतात. पण काय करू सर, माझा स्वभावच असा आहे. मला वाटते "हे काम मी केले पाहिजे, माझी मदत सर्वांना झाली पाहिजे." म्हणून प्रत्येक वेळी मी असा पुढे पुढे होऊन कामात सहभागी होण्याचे धडपड करतो. बाकी काही नाही सर."

सर म्हणाले - "सुधीर, तुझा मूळ स्वभाव छानच आहे. तुझा हेतू निर्मळ आणि स्वच्छ असतो - हे देखील सर्वांना माहिती आहे, म्हणून तर तू सर्वांना हवाहवासा वाटणारा मित्र आहेस. तुझ्या विषयी कुणाच्या मनात शंका ती नाहीच आहे. पण बेटा सुधीर, जरा बदलून घे तुझा स्वभाव. असे एक ना धड भाराभर हा उद्योग बरा नव्हे.. या दुर्गुणामुळे तुझ्या हातून कार्य यशस्वी होऊ शकत नाही. तुझ्या पद्धतीवर विश्वास कसे ठेवतील सारेजण? याचा विचार कर! तेंव्हा यापुढे जे करीन, ते व्यवस्थित आणि छानच करीन" असा निर्धार कर. बघ, तुझ्या कार्याला उत्तम यश लाभते की नाही ते."

समंजस सुधीरने सरांचे सांगणे अगदी मन लावून ऐकले. "खरेच, आपल्या स्वभावातील हा दोष, आपण स्वतःच दूर करू शकतो. बाकी कुणी काय मदत करणार या बाबतीत!, आपण प्रयत्न केलाच पाहिजे, कारण या बदलामुळे फायदा आपल्या स्वतःचाच आहे.!"

त्या दिवशी रात्री जेवणानंतर नेहमी प्रमाणे आई-बाबा आणि दीदी बोलत बसले. घरात होणाऱ्या कार्यक्रमाची चर्चा सुरु झाली. त्याच वेळी सुधीरने एक मोठा कागद सर्वांच्या समोर ठेवीत म्हटले ...

" आई -बाबा आणि दीदी, आपल्या कार्यक्रमाला अजून पंधरा दिवस बाकी आहेत. त्यासाठी काय काय आणि कुणी करायचे? याचा मी केलेला हा बघा - मास्टर-प्लैन. तुम्ही सर्वांनी पहा, विचार करा आणि सूचना पण करा, मी त्याप्रमाणे हा समारंभ करून दाखवतो. बाबा, माझ्या सरांनी मला "गुरुमंत्र " दिलाय,आता मी त्याप्रमाणे स्वतःला बदलून दाखवणार आहे."

बाबांनी सुधीरचा प्लैन पाहिला. खूपच छान प्लैनिंग होते. वेळेसहित सगळ्या गोष्टींचा समावेश होता त्यात. त्यातील एकेक मुद्दा बाबांनी आई आणि दिदीला वाचून दाखवला. ते ऐकून आपला गडबड्या रामू -सुधीरभाऊ - इतका छान विचार करतो आहे- या कल्पनेने आई खुश झाली, आणि सुधीरकडे पहात दीदी म्हणाली- “अरे वा - स्मार्ट झाला की तू ...! "

सर्वांनी मिळून सुधीरला म्हटले - आता तू सांगशील ते -ते आम्ही करू. बेस्ट लक सुधीर.

बघा मित्रांनो, मोठ्या लोकांनी सांगितलेले ऐकण्यात आणि तसे वागण्यात आपले भले असते. अरे हो -काय कार्यक्रम आहे हे तर सांगयचे राहिलेच की- सुधीरच्या आजोबांचा अमृत-महोत्सव ",म्हणजे पंचाहत्तरवा वाढदिवस साजरा करण्याचा कार्यक्रम". आता एक करू या - मी फोन करेन तुम्हाला - आपण मिळून जाऊ या सुधीरच्या घरी फंक्शनला. खूप मज्जा येईल. येताय ना नक्की!

# जीभ गोड तर सारे जग गोड

नेहा आज खूप खूष होती, त्याला तसेच छान कारणही होते-

पुढच्या रविवारी नेहाचा हॅप्पी बर्थ डे. गेल्या काही दिवसांपासून नेहाची आणि तिच्या मम्मीची धावपळ चालू होती. वाढदिवसाच्या पार्टीचे निमंत्रण फक्त नेहाच्या मित्र-मैत्रीणींनाच नव्हे तर सोबत त्यांच्या आई-बाबांना पण निमंत्रण होते. सोसायटीच्या मोठ्या हॉलमध्ये हा समारंभ साजरा करण्याचे ठरवले होते.

तसं म्हटलं तर वाढदिवस दरवर्षीच साजरा होत असतो. मग या वर्षी समारंभ" कशा साठी? नेहाला अनेकांनी विचारले सुद्धा. याचे कारण असे होते की नेहाचा अभयदा या वर्षी इंजिनियर झाला, लगेच जॉबपण मिळाला त्याला. नेहा मग आईला म्हणाली - आपल्या अभयदादाच्या या आनंदाच्या बातम्या आपण माझ्या वाढदिवसाच्या निमित्ताने सर्वांना सांगू या. सगळ्यांना आपण "पार्टी " दिल्या सारखे पण होईल आणि एकाच वेळी खूप जण एकत्र येत आहेत, मस्त होईल - भेटी -गप्पा - खाणे - ग्रेट मजा !!

आई आणि बाबांना नेहाची आयडीया आवडली. तसे पाहिले तर आजकाल सर्वजण आपापल्या वेळापत्रकात इतके बुडालेले असतात की - मोकळा वेळ अजिबात नसतो; मग त्यात मोठी माणसं, मुलं अशी दोघंही आहेत. शाळेच्या वेळा, नंतरचे क्लास, अभ्यास, वेगवेगळ्या परीक्षा, शाळेतील कार्यक्रम हे तर असतेच. त्यात घर आणि शाळा यातील अंतर खूप जास्त असेल तर आणखी वेळ द्यावा लागतो. बाप रे. सोमवार- ते शुक्रवार, आठवडा - दिवस -महिने - नुसते भराभरा पळत असतात, एकदा हातून निसटले की पुन्हा सापडण्याचे नाव नाही.

नेहाचे बाबा एखादे वेळी म्हणायचे, "काय हे आपले रोजचे वेळापत्रक! स्वतःसाठीच्या कामातच इतके बुडून गेलेले आहोत की, त्यात इतरांसाठी काही करावे यासाठी लागणारा वेळ आहे का कुठे शिल्लक?"

नेहाच मग म्हणाली - "अहो बाबा -एक करू या आपण. माझा वाढदिवस आपण सर्वांच्या सहभागाने साजरा करू या, आणि कार्यक्रम रविवारी ठेवू या, म्हणजे सारेजण येतील. खरेच खूप दिवस झाले, आपण एकत्र येऊन धमाल केली नाही, आता नक्की करू या."

अभयदादा म्हणाला - "नेहा, तू एवढ्या उत्साहात ठरवते आहेस, लोक येतील ना? कारण प्रत्येकाचे अगोदर पासूनच काही ना काही ठरलेले असते, ऐनवेळी वेळच नसतो कुणाजवळ."

नेहा म्हणाली - अरे अभयदा - आता अशी वेळ आली आहे की - लोकांना वाटते आहे की - "आपल्याला कुणी प्रेमाने -आग्रहाने - आपलेपणाने बोलवावे. त्यामुळे, बघ तू - आपण ज्यांना बोलावू ते सारेजण येतील. माझे फ्रेंड - तुझे फ्रेंड -आई-बाबांचे परिचित मंडळी, आपली नातेवाईक, सोसायटीमधील आपले मेम्बर्स, बघ, किती वेगवेगळे माणसे येणार आहेत. मज्जा येईल हे नक्की."

नेहाच्या वाढदिवसाच्या पार्टीला इतक्या मोठ्या संख्येने पाहुणे येणार याला कारण ही तसेच होते - ते म्हणजे - नेहा, तिचे आई आणि बाबा, तिचा अभयदादा - त्यांच्या मित्र-परिवारात खूप पॉप्युलर होते. "सगळ्यांशी मिळून-मिसळून रहाणारे हे चौघेजण" जातील त्या ठिकाणी हवीहवीशी वाटणारी होती. हा असा खास स्वभाव-विशेष या घरातील सर्वांचा होता - कारण मोठ्यांनी केलेले संस्कार, दिलेली शिकवण. मुख्य गोष्ट म्हणजे आपल्या बोलण्यातून-वागण्यातून हे जाणवले पाहिजे, या वर नेहाच्या आई-बाबांचा कटाक्ष असायचा.

आपल्या भोवताली "बोलघेवडे राघू" खूप असतात, पण कृतीतून काही करणे याचा खरा परिणाम जाणवत असतो. "माणसे जोडणे" हीच आवड असणारी माणसे, कायम छान आणि लाघवी बोलत असतात. मनात शिरण्याची कला

त्यांना अवगत असते. म्हणतात ना "जिभेवर साखर असली की प्रत्येक काम सहजतेने होऊन जाते." याच्या उलट तुसडेपणाने वागणाऱ्याला, दुसऱ्याला दुखावणाऱ्याला - कोण विचारतंय?. "जिभेवर साखर असणारी माणसे" नेहाच्या घरात होती. तिची आई-बाबा मोकळ्या मनाने, हातचे काही न राखता, जमेल तशी मदत करीत. त्यांच्या या स्वभावामुळे त्यांच्या भोवती कायम माणसे असत, आणि त्यांच्या असण्याने सभोवातली "आनंदाचे वातावरण असायचे. "आई-बाबांच्या स्वभावाला पूरक असाच स्वभाव नेहाचा, आणि तिच्या अभयदादाचासुद्धा होता. या चौघांना सर्वांकडून प्रेम-आदर,सन्मान मिळत असे.

या सर्व गोष्टीसाठी ते पैसे  खर्च करीत असतात का?

मुळीच नाही. उलट जिव्हाळ्याचे शब्द, आपुलकीचे शब्द हेच त्यांचे धन आहे. हा पैसा मात्र ते सर्वांना मुक्त हस्ते देत असतात.

आपणहून लोकांच्या मदतीस धावून जाणारे नेहाचे बाबा - हे सोसायटीचे सेक्रेटरी, आफिसातील  युनियनचे सेक्रेटरी, कोणताही समारंभ असो - नेहाचे बाबा सगळेकडे "एकमेव सेक्रेटरी" असायचे. ऑफिसमधील कामाची जबाबदारी पार पाडतांना इतरही अनेक कार्य ते हसतमुखाने करीत, तेव्हा या माणसाच्या अफाट उत्साहाचे सर्वजण कौतुक करीत. अशावेळी नेहाची आई म्हणे.."अहो, कौतुक काय करताय? यांना राहावतच नाही कार्य केल्या शिवाय."

अशा हव्या-हव्याशा परिवारातील नेहाच्या वाढदिवसाची पार्टी आणि समारंभ म्हटल्यावर ऐकून सगळ्यांना खूप आनंद झाला. सगळेजण घरी येऊन म्हणाले "पार्टी कशी करायची?, तयारीला, मदतीला आम्ही येणार बरं का नेहा, तू बोलावले नाहीस तरी आम्ही येणार!"

हे पाहून अभयदा म्हणाला सुद्धा - "आई, बाबा, अहो, तुमच्या छान मैत्रीमुळे हे सगळे होते आहे. तुम्ही एवढी माणसं जोडलीत, आम्हाला खूप अभिमान वाटतो तुमचा. हो ना ग नेहा?"

"हो रे अभयदा. माझ्यापुढे आदर्श म्हणून माझ्या आई-बाबांचेच उदाहरण आहे.".

आई-बाबांनी मोठ्या कौतुकाने आपल्या मुलांकडे पाहिले. त्यांची आता पक्की खात्री झाली होती की आपल्या छान संस्कारांचा वारसा नेहा आणि अभय अगदी मना पासून संभाळणार आहेत. कारण या मुलांना पटले आहे की-"जीभ गोड तर -सारे जग गोड !!

अभयदा म्हणाला - नेहा, तुझ्या वाढदिवसाची पार्टी मस्त होणार. बोलाव मित्रांना आपण सगळे मिळून तयारी करू या पार्टीची .आणि आनंद मिळवू या. मित्र हो- वाढदिवसाच्या पार्टीचे आमंत्रण तुम्हाला आणि मला सुद्धा येणार आहे बरे का. नेहा -आपल्या सर्वांची आवडती फ्रेंड ना!, तिचा फोन आला की आपण यस म्हणायचं. यस ना?

# शेजारच्या आजी

रविवारची सकाळ म्हणजे नेहाची आवडती सकाळ -आवडीची वेळ. कारण या सकाळीच फक्त उशिरा उठण्याची तिची इच्छा पूर्ण होत असायची, सोम ते शनी, आठवड्याचे सगळे दिवस, शाळा, क्लास, आणि पाठीवरची भली मोठी बॅग,,हे एवढे सगळे संभाळून घेण्यात  कसे जायचे कळायचे देखील नाही. आणि हे सांगणार तरी कुणाला? तिच्या सोबतच्या कुणाचीच यातून सुटका नव्हती.

नेहाला वाटले, "निदान आज तरी हे सर्व आठवणे नको. मस्त साखर-झोपेची मजा घेत लोळत पडून रहावे. "

पण, किचनमधून मोठ्या आवाजातील बोलणे तिच्या कानावर पडले. नेहाला आश्चर्य वाटले "इतक्या सकाळी कोण आले असावे, आणि आईला पण बोलण्यासाठी वेळ काढावा लागतोय?" आपल्या विंगमध्ये आजूबाजूला कुणी नवे शेजारी आलेत याचा पत्ता पण नाही आपल्याला. कम्माल झाली. आणि कोण आले आहे हे पाहण्यासाठी  आता किचनमध्ये जावेच लागणार, आता कशाची आलीय झोप.

किचनमध्ये जाण्या अगोदर नेहाने "आपला अवतार दिसू नये " म्हणून स्वतःला आवरले. नाही तर आई रागावली असती. एरव्ही  चालून गेले असते, पण नव्या  पाहुण्याच्या समोर असा बावळा-वेश शोभला नसता.

आईच्या समोर एक आजीबाई बसलेल्या दिसत होत्या, आईपेक्षा फार मोठ्या नसाव्यात, पण रुपेरी केस, डोळ्यावरचा नाजूक चष्मा, बोलकी नजर, आणि नम्र आवाजातील  शब्द, सारे काही खूप प्रभाव पाडणारे आहे, असेच त्यांच्याकडे पाहून नेहाला वाटले.

"काय नेहा - झाली का रविवारची सकाळ?", त्यांनी इतक्या गोड आवाजात विचारले की, या आजींनी पुन्हा असेच विचारावे असे नेहाला वाटले.

काही न बोलता हसऱ्या चेहेऱ्याने ती आजी कडे पाहतच राहिली.

इतक्या छान व्यक्तीशी सकाळची ही अशी भेट नेहाला खूप आवडली.

आई नेहाला सांगू लागली - अग नेहा या आजी किनई, आपल्या अगदी समोरच्या घरात आल्या आहेत, त्यांच्या मुलाकडे - काही दिवस. अजून कुणाच्या ओळखी झाल्या नाहीत, बघ ना, त्यांचा मुलगा, अभी-काका म्हणतेस ना तू, तो आजसुद्धा ऑफिसला गेला आहे. अर्जंट मिटिंग आहे म्हणून. मग आजीनी मला बोलावून म्हटले- मी येऊ शकते का हो सकाळी –सकाळी तुमच्याकडे? तुमच्या घरातील मंडळींना आवडेल ना मी आले तर?

मी म्हटले- अहो, त्यात काय विचारायचे! जरूर या, दिवसभर रहा आमच्यासोबत, आम्ही तरी तिघेच आहोत घरात - मी, नेहा आणि नेहाचे बाबा. बस. आम्हाला कुणी बोलायला आले याचा नक्कीच आनंद वाटेल. या तुम्ही.

नेहाला खूप छान वाटले- आई, तू खूप छान केलेस. या आजी आज आपल्या पाहुण्या. मी माझी सुट्टी त्यांच्या सोबत घालवील. मला तर आपल्या दोन्ही आजींची आठवण झाली या आजींना पाहून.

नेहाला झालेला आनंद पाहून आजी म्हणाल्या - तुझ्या दोन आजी कोणत्या ग?

अहो- आईची आई- ती एक आजी, आणि माझ्या बाबांची आई -ती पण मोठी आजी. दोघी त्यांच्या गावी असतात. कधी तरी येतात. कधी आम्ही पण जातो. माझ्या दोन्ही आजी खूप लाड करतात बर का माझे. नेहाने कौतुकभरल्या आवाजात सांगून टाकले.

नेहा, ही तुझी नवी, शेजारची आजी पण खूप लाड करेन. तू आता माझी छोटीशी मैत्रीण होणार ना?

शेजारच्या आजींचे असे गोड बोलणे ऐकून नेहा म्हणाली- जरूर, ही नेहा आजपासून तुमची बेस्ट-फ्रेंड झाली समजा...।

चहा सोबत खूप वेळ गप्पा रंगल्या. आजीने नेहाला शाळा आणि अभ्यास या शिवाय काय काय आवडते हे विचारले. नेहाने पण मोकळेपणाने सांगितले.

आजी म्हणाल्या -अभ्यास तू करतेस हे तर उत्तमच, त्याशिवाय तुला आनंद देणाऱ्या गोष्टी आवडतात, हे मला जास्त आवडले.

नेहा -तुला संध्याकाळी माझ्यासाठी आणि माझ्या सोबत अधून-मधून काही वेळ देता येईल का? हां आग्रह नाही. पण तुझी मदत झाली तर मला खूप उपयोगाचे असेल.

चहा घेतल्या नंतर आजी परत निघाल्या.

काही दिवस गेले आणि आजींनी नेहाच्या आईला विचारलं - नेहाला मी माझ्या बरोबर फिरायला घेऊन जाऊ का? आईने लगेच परवानगी दिली.

त्यादिवशी नेहा शेजारच्या आजीबरोबर एका आश्रमात जाऊन आली. अनाथ-आश्रम म्हणाले तरी चालले असते याला. पण तसा उलेख करणे कुणालाच आवडत नसे. सगळ्या वयोगटातील मुले-स्त्री,आणि पुरुष तिथे होते. २ तास तिथे आजीनी सर्वांशी गप्पा मारल्या.

परत घरी जातांना नेहा म्हणाली - "आजी, तुम्ही तर आत्ता इथे आलात, मग हा आश्रम, हे लोक तुमच्या परिचयाचे कसे?,आणि हे काम तुम्ही का आणि केव्हापासुन करताय?"

आजी हसल्या आणि म्हणाल्या - नेहा, अभिकडे यावेळी राहायला आले म्हणून आपला परिचय झाला. खरे तर मी इथे नेहमीच येते. या लोकात रहाते. हे

माझ्याच परिवारातील आहेत असे माझी भावना आहे. ज्या ज्या गावी मी जाते, तिथे अशा संस्था शोधून काढते, आणि अशा लोकांच्या सोबत राहून येते. आपण काही देऊ शकतो, करू शकतो, तर जरूर करावे, या भावनेतून मी माझा थोडा वेळ या मित्रांना देते. पैश्याची अपेक्षा इथे कुणीच करीत नाही, त्यांची अपेक्षा, आपल्यावर कुणी प्रेम करावे, आपलेपणाने चार शब्द बोलावे इतकीच. ही अपेक्षा जे पूर्ण करतील अशी माणसे, त्यांच्यासाठी "आपली माणसे" असतात.

आजींच्या या भावना, शब्दातील जिव्हाळा नेहाला भारावून टाकणारा होता.

मनातल्या मनात तिने ठरवले - या कामात आपल्या खास फ्रेंड्सना पण घ्यायचे. कित्ती मोठे समाधान आहे अशा कार्यात. हे आपण नक्की करायला हवे आहे.

"काय ग नेहा - कसला विचार करते आहेस?, या आजीसोबत कशाला आलोत, वेळ वाया जातोय असे तर नाही वाटले ना तुला नेहा?"

हे ऐकून आजींचा हात हातात घेऊन नेहा म्हणाली - अहो आजी,असं काय बोलताय? असे काही नाही, उलट तुमच्या सारखे कार्य करण्याचा आम्ही थोडातरी प्रयत्न केला तर खूप समाधान मिळेल. आजी एक विचारू तुम्हाला?

अग विचार की, संकोच करू नकोस नेहा ...

आजी - पुढच्या वेळी मी माझ्या फ्रेंड्सना सोबत घेतले तर चालेल का?

वा, नेहा - या गोष्टीला मी नाही कसे म्हणू? उलट मला आनंदच वाटेल, की तुझ्यामुळे मला अजून छान कार्यकर्ते मिळणार आहेत. तू जरूर घेऊन ये. आपण सारे मिळून जाऊ या.

नेहाने आपल्या काही मित्रांना आणि मैत्रीणीना "शेजारच्या आजीबद्दल आणि त्यांच्या कार्याबद्दल सांगितले, आणि म्हणाली -तुम्हाला कुणाला जर

आमच्या या कार्यात सहभागी व्हायचे असेल तर, माझ्याकडे यावे, मी तुम्हाला घेऊन जाइन. "

दोन चार जण म्हणाले, नेहा आम्ही येऊ. पाहू तर खरे - तुझ्या शेजारच्या आजी करतात तरी काय? पाहू, आवडले तर सोबत राहु.

ठरल्या प्रमाणे नेहा आणि तिचे फ्रेंड्स आश्रमात गेले, तिथल्या वातावरणात त्यांना जीवनाचे एक वेगळे रूप पाहण्यास मिळाले, आणि "आपण काही दिले पाहिजे " ही जाणीव मनात निर्माण झाली. घरी निघाल्यावर नेहाचे मित्र म्हणाले आजी -तुमच्यामुळे आज पहिल्यांदा आम्ही आमच्या पलीकडचे जग पाहिले, त्यात रहाणारे पाहिले. आम्ही नक्कीच आम्हाला जमेल त्या स्वरूपात काही करु.

बाळानो - तुम्हाला असे काही वाटले,मला खूप बरे वाट ले. याचे क्रेडीट तुम्ही तुमच्या या छान आणि गुणी मैत्रिणीला द्या - कारण या नेहामुळे तर तुम्हाला आज नवी दृष्टी मिळाली. नेहाच्या पाठीवर आजी हात ठेवून हे सांगत होत्या, मित्रांच्या नजरेत नेहा बद्दलचे कौतुक होते.

काही न बोलता नेहा आदर भावनेने पहात होती- आपल्या शेजारच्या आजीकडे ....!

# मन मोठे असावे

अभ्यासू मुलांना शाळेत, मित्रांमध्ये,आणि इतर परिचित मंडळीमध्ये नेहमीच एक मान मिळत असतो, त्यांचे कौतुक केले जाते. काही मुले अभ्यासात हुशार असतात, ते करीत असतांना खेळ असो, सांस्कृतिक कार्यक्रम असोत, ते सर्व ठिकाणी सहभागी होऊन आपले अस्तित्व जाणवून देत असतात.

दोन्ही ठिकाणी हे "चमकणारे -तारे " त्यामुळे सहाजिकच शाळेत या "हरहुन्नरी मुलाना विशेष स्थान असते.

आपली मैत्रीण नेहा, अशीच सर्वप्रिय मैत्रीण आहे, अभ्यासात हुशार, त्या बरोबरीने तिचा सहभाग तिच्या आवडत्या खेळात "टेबल-टेनिस" मध्ये हमखास असतो. सांस्कृतिक कार्यक्रमात संधी मिळाली की ती भाग घेतेच घेते.

आत्ताच बघाना - शाळेच्या टेबल-टेनिस संघामध्ये तिची अगदी अनपेक्षितपणे निवड झाली. ती तिच्या वर्गातील चॅम्पियन असल्यामुळे, संघ-निवडसमितीने तिच्या नावाचा विचार केला. आणि चाचणी सामन्यात नेहाने खूप छान खेळ करीत प्रभावी कामगिरी केली. लवकरच होणाऱ्या आंतर -शालेय स्पर्धेसाठी तिच्या शाळेच्या संघात तिचा समावेश केला गेला, तेव्हा आश्चर्य वाटले, आनंद तर खूपच झाला.

३ खेळाडूंच्या संघात नेहाबरोबर स्वराली आणि मुग्धा या दोन उत्तम खेळाडू असलेल्या मैत्रिणींचा समावेश होता. यात एक प्रॉब्लेम निर्माण झाला. स्वराली आणि मुग्धा -उत्कृष्ट खेळाडू होत्या. अनेक स्पर्धांत त्या विजेत्या असायच्या. शाळेला त्यांनी अनेक बक्षिसे मिळवून दिली होती. पण अलीकडे या दोन विजेत्या खेळाडू मध्ये काही बिनसले होते. एकमेकींचा "इगो" दुखावला होता. स्वराली म्हणाली -मुग्धा कर्णधार झाली तर मी टीम मध्ये खेळणार नाही.

आणि मुग्धा म्हणाली- सर, स्वराली कॅप्टन असेल तर माझा विचारच करू नका प्लीज. काय करावे?- उत्तम संघ नसेल तर  स्पर्धेत भाग घेऊन काय उपयोग?

सर म्हणाले - हे पहा - मुग्धा, स्वराली - तुम्ही कर्णधार होऊ इच्छित नाही, पण टीम मध्ये खेळण्यास तर तयार आहात ना?

हो सर, नो प्रोब्लेम - पण!

आले लक्षात माझ्या -सर म्हणाले.

आपण असे करू या - नेहाला कर्णधार करुया टीमचा. तुम्हा दोघींची ती छान मैत्रीण आहे, आणि ती एक उत्तम खेळाडू आहे, ही गोष्ट सांगण्याचे गरजच नाही. हो ना?

स्वराली आणि मुग्धाला -सरांनी सुचवलेला हा पर्याय आवडला. आमची याला हरकत नाही. नेहा नवीन असली तरी आम्हाला "कॅप्टन "म्हणून चालेल.

या घडामोडी नेहाला माहिती नव्हत्या

दुसरे दिवशी शाळेच्या नोटीस बोर्डवर "टेबल -टेनिस संघाची" घोषणा लावली गेली- कर्णधार "नेहाचे" नाव पाहून नेहाला विश्वासच बसेना. स्वराली आणि मुग्धा सिनियर खेळाडू असतांना आपण कर्णधार? असे कसे झाले? नेहा विचार करीत राहिली.

सरांनी आणि सर्वांनी नेहाचे अभिनंदन केले, शुभेच्छा दिल्या.

घरी आल्यावर नेहाने ही बातमी आई-बाबांना सांगितले, अभयदाला फोन करून सांगितली.

रात्री काही केल्या तिला झोप येईना, आई म्हणाली - काय ग- कॅप्टन झाल्याच्या आनंदात झोप पळून गेली की काय नेहा?

आई - तसे काही नाही गं. कॅप्टन झाल्याचा आनंद मला आनंद नक्कीच आहे. पण वाईट याचे वाटते की - स्वराली आणि मुग्धा यांच्यापैकी एकजण कॅप्टन असायला हवे होते. कारण त्यांचा अनुभव आहे, परिश्रम आहे. मी काय नवखी, आणि आजच पहिल्यांदा टीम मध्ये. केवळ त्या दोघींचे जमत नाही म्हणून हा पर्याय -मी कॅप्टन होणे, मला योग्य वाटत नाही. मी स्वराली आणि मुग्धाशी बोलू का ग एकदा. या बाबतीत?

आईला नेहाच्या विचारांचे कौतुक वाटले- एवढी संधी मिळूनही ती आधी दुसऱ्यांचा विचार करते आहे, नेहाचे मन स्वार्थी नाही -किती छान.

नेहा, तू स्वराली आणि मुग्धा दोघींशी बोलून घे, मनावरचे ओझे मोकळे झाले तरच तू तुझ्या कॅप्टनशीपचा आनंद घेऊ शकशील. उद्या सकाळी बोलून घे आता शांतपणे झोप..

सकाळीच स्वराली आणि मुग्धाबरोबर नेहा खूप वेळ बोलत होती. पण माघार घेण्यास दोघी तयार नव्हत्या. आम्हाला तू कॅप्टन म्हणून चालणार आहेस. मग आम्ही तुला तुझ्या टीम मधले प्लेयर म्हणून चालणार नसणार तर सरांना सांगून टीम बदलून घे नेहा.

यावर काय बोलावे नेहाला सुचेना. ती गप्प राहिली. शाळेच्या हितासाठी निवड झालेली टीमच खेळणे योग्य होते.

शाळेत गेल्यावर ती सरांना भेटली - म्हणाली -सर, मी कॅप्टन झाली खरे, पण, माझ्या मते स्वराली किंवा मुग्धा कॅप्टन होणे अधिक योग्य होते. मी आज सकाळी बोलले दोघींना - पण "इगो -प्रोब्लेम "फार मोठा दिसला त्यांचा.

नेहाचे ऐकून सर म्हणाले- मला हे सर्व माहिती आहे. तू म्हणून एवढा कमीपणा घेतला आणि त्या दोघींना बोललीस तरी. दुसऱ्या एखाद्या मुलीने कॅप्टनच्या रुबाबात वागणे -फिरणे सुरु केले असते आत्तापर्यंत. नेहा एक लक्षात ठेव. तुझे मन मोठे आहे, असेल. पण सगळेच अशा मोकळ्या आणि मोठ्या

मनाचे नसतात. तुला कॅप्टन म्हणून मोठी संधी मिळाली आहे. एक खेळाडू म्हणून त्याचे सोने कर. माझे आशीर्वाद आहेत, शुभेच्छा आहेत तुझ्या टीमच्या सोबत.

भारावून गेलेली नेहा -सरांच्याकडे पाहतच राहिली.



# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रांनो.

कशा वाटल्या कथा?

म्हटले तर या कथा. म्हटले तर चार समजुतीच्या गोष्टी. मुलांना, विशेषतः आताच्या मुलांना समजुतीच्या गोष्टींची गरज आहे. आताच्या मुलांच्या घरगुती संवादाची जागा हळू हळू कॉम्प्युटर आणि मोबाईल यांनी घ्यायला सुरूवात केली आहे. काही कुटुंबांत तर मुलांचा आवाज घरचे लोक ऐकतात तो फ़क्त मोबाईलवर बोलतानाच. खेळ सुद्धा मोबाईलशीच. हसतात तेही मोबाईलबरोबरच.

अशावेळी ई साहित्य प्रतिष्ठान हे सुद्धा याच पिढीतल्या मुलांनी सुरु केलं आहे. संवादाचं एक माध्यम म्हणून. दिवसभर मोबाईलशी चिकटवून ठेवलेल्या मुलांना मोबाईलवरच मराठी पुस्तके उपलब्ध करून देणारी ही संस्था. तीही फ़्री. दर आठवड्याला किमान एक पुस्तक प्रकाशित करते. जे मोबाईलवर, ऐपद्वारे, नेटद्वारे किंवा मेलद्वारे वाचता येते. मुलांनी मोबाईलवर इतर गोष्टींबरोबर वाचनही करावे हा यामागचा उद्देश. अनेक मराठी तरूणांना हे आवडते आहे. ती आता फ़ॅशन बनते आहे. इतर फ़ॅशनपेक्षा वाचनाची फ़ॅशन काय वाईट?

ही पुस्तके जास्तीत जास्त मराठी लोकांपर्यंत पोहोचायला हवीत. यासाठी आपली मदत हवी. कृपया आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षर मराठी लोकांचे ई मेल पत्ते द्या. त्यांना ही पुस्तके आम्ही विनामूल्य पाठवत राहू.

आमचा पत्ता : **esahity@gmail.com**

***आपले कृपाभिलाषी***
***टीम ई साहित्य प्रतिष्ठान***
***www.esahity.com***